महानगरपालिका नगरसेवक स्वेच्छा
निधीमधून घ्यावयाची कामे
मार्गदर्शक तत्वे.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,

पूरक परिपत्रक क्रमांक :- एएमसी १४२००/२२६४/प्र.क्र.१४४/नवि-२४

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२. दिनांक :- १० ऑक्टोबर, २००२.

**पहा** :- १) परिपत्रक क्र. एएमसी १४२००/२२६४/प्र.क्र.१४४/नवि-२४ दिनांक २६/२/२००१.

२) पूरक परिपत्रक क्र. एएमसी १४२००/२२६४/प्र.क्र.१४४/नवि-२४ दिनांक २८/६/२००१.

३) आयुक्त, पुणे महानगरपालिका यांचे अ.शा. पत्र क्र. मआ/२२१ दिनांक १४/१/२००२.

४) अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र.अति.आयुक्त /प्रकल्प/५६४ दिनांक २१/१/२००२.

**प्रस्तावना** :- राज्यातील महानगरपालिकांमध्ये प्रत्येक नगरसेवकांस नगरसेवक स्वेच्छा निधी म्हणून महानगरपालिका अंदाजपत्रकात करण्यात येत असलेल्या तरतुदींचा विनियोग योग्य अशा नागरी सेवा सुविधांवर व्हावा यास्तव या निधीतून कोणती कामे घेण्यात यावीत व कोणती कामे घेण्यात येऊ नयेत, याबाबत दिनांक २६ फेब्रुवारी, २००१ च्या शासन निर्णयान्वये मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्यात आली होती आणि दिनांक २८ जून, २००१ च्या पूरक परिपत्रकान्वये अनुज्ञेय कामांच्य यादीमध्ये (परिशिष्ट "अ") ५ कामांचा समावेश करण्यात आला आहे. आयुक्त, पुणे महानगरपालिका व अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांनी खालील कामांचा नगरसेवक स्वेच्छा निधीतून घ्यावयाच्या कामांत अंतर्भाव करण्यात यावा असा प्रस्ताव सादर केला आहे.

अ) गांडूळ खत प्रकल्प राबविणे.

ब) विभागवार वेगवेगळ्या खात्यातील कामगारांच्या हजेरी चौक्या तयार करणे किंवा अस्तित्वात असलेल्या चौक्यांची दुरुस्ती करणे (परिशिष्ट "अ" अनुक्रमांक ११ मध्ये अंतर्भूत करणे)

याशिवाय केंद्र शासनाने नागरी घनकचरा (व्यवस्थापन व हाताळणी) नियम २००० ची अंमलबजावणी सर्व महानगरपालिकांवर बंधनकारक केलेली असल्याने त्याची अंमलबजावणी व संत गाडगेबाबा स्वच्छता अभियान कार्यक्षमपणे पार पाडण्याचे दृष्टीने यासाठी हाती घ्यावयाची भांडवली खर्चाच्या कामांचा अंतर्भाव अनुज्ञेय कामांमध्य करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**पूरक परिपत्रक** :- शासन परिपत्रक क्र. एएमसी १४२००/२२६४/प्र.क्र.१४४/नवि-२४ दिनांक २६ फेब्रुवारी, २००१ तसेच समक्रमांकाच्या जून, २००१ च्या पूरक परिपत्रकान्वये नगरसेवक स्वेच्छा निधीमधून घेण्याच्या अनुज्ञेय कामाच्या यादी (परिशिष्ट "अ") मध्ये खालील दोन कामांचा समावेश करण्यात येत आहे.:-

अ) नागरी घन कचरा व्यवस्थापन व निर्मुलन यांचे अंतर्गत तसेच संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियान यांचे अंतर्गत घ्यावयाची सर्व प्रकारची भांडवली खर्चाची कामे.

ब) विभागवार वेगवेगळया खात्यातील कामगारांच्या हजेरी चौक्या तयार करणे किंवा अस्तित्वात असलेल्या चौक्यांची दुरुस्ती करणे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( प्र. मा. माळवदकर )
महाराष्ट्र शासनाचे, उप सचिव

प्रत,

आयुक्त, सर्व महानगरपालिका.
नगर सचिव, सर्व महानगरपालिका.
प्रधान सचिव-१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई. - ४०० ०३२.
सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
सर्व सह सचिव / उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
कार्यासन अधिकारी, नवि-४, २०, २१, २२, २३, २५, २६ नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०२.
निवडनस्ती, नवि-२४